ई साहित्य प्रतिष्ठान

# नागपुरी तडका

कवी - गंगाधर मुटे

प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान
पुस्तकाचे नाव : नागपुरी तडका
लेखक : गंगाधर मुटे
☎ ९७३०५८२००४
✉ esahity@gmail.com

मुखपृष्ठ व ई पुस्तक निर्मिती : Last Bench Designs

विनामूल्य वितरणासाठी उपलब्ध आपले वाचून झाल्यावर आपण हे पुस्तक फ़ॉरवर्ड करु शकता

*e Sahity Pratishthan®*
*eleventh floor*
*eternity, G1102*
*eastern express highway*
*Thane. 400604*
*Ph : 9869674820*

हे ई पुस्तक वेबसाईटवर ठेवण्यापुर्वी किंवा वाचनाव्यतिरिक्त कोणताही वापर करण्यापुर्वी ई साहित्य प्रतिष्ठानची परवानगी घेणे आवश्यक आहे.
या पुस्तकातील लेखनाचे सर्व हक्क कवीकडे सुरक्षित असून पुस्तकाचे किंवा त्यातील अंशाचे पुनर्मुद्रण किंवा नाटक, सिनेमा, सिरियल, स्टेज शो किंवा तत्सम रुपांतर किंवा भाषांतर करण्यासाठी कवीची परवानगी घेणे आवश्यक आहे.

©esahity Pratishthan® 2012

# प्रकाशकाचे दोन शब्द

मराठी अमृताहून गोड भाषा. पण तिच्या ग्रामीण बोलींना जो गोडवा, तजेला आणि मसालेदार झणझणीत तडका आहे तो पुस्तकी शहरी मराठीत नाही.  कोकणची खुमासदार मालवणी घ्या किंवा कोपरखळया मारणारी अहमदनगरची नगरी , सणसणीत गोळीबंद आगरी किंवा मिठ्ठास खानदेशातली अहिराणी. गांवोगांवच्या या भाषांची मज्जाच न्यारी. अगदी ज्वारीच्या भाकरीबरोबर तांबड्या रश्शासारखी. ज्यांनी अशा भाषांतून व्यवहार केला नाही ते कमनशीबीच. या भाषा म्हणजे अस्सल संस्कृतीची खाण आहे. त्यामुळे आज वऱ्हाडी भाषेतल्या या कवितांची मेजवानी तुमच्यासमोर आणताना आम्हाला प्रचंड आनंद होत आहे.

पण गंगाधर मुटे यांच्या नागपुरी तडक्यात केवळ भाषेचा फ़ुलबाग नाही. काळजाची आग आहे. उपाशी शेतकऱ्याच्या पोटात खवळणाऱ्या ऍसिडमधल्या या कविता आहेत. विदर्भातल्या शेतकऱ्यांच्या अत्महत्यांवर अश्रू गाळणारं भरपूर लिखाण आजवर झालंय. “बिचारा शेतकरी” असंच विदर्भातल्या शेतकऱ्याचं वर्णन इतर लेखक कवी करतात. मनापासून त्यांना त्याच्या दुःखाची संवेदना जाणवते यात वाद नाही. पण गंगाधर मुटेंच्या कवितेत हाच शेतकरी हात पसरून नाही तर मुठी वळून येतो. वाकून नाही तर ताठ मानेने येतो. गुंडा नोयता तरीबी पन, गुंड्यावानी वागतो. त्यांची जनता बिचारी नाही तर विचारी आहे. आणि ती अविचारी होण्यापुर्वी पिळणाऱ्यानी आणि गिळणाऱ्यानी सावध व्हावे असा इशारा ती घेऊन येते. त्यांचा शेतकरी “खादीचं धोतर सोडून, मांजरपाठ घालणाऱ्या” पुढाऱ्यांना खणखणीत दणके घालणारा आहे.

गंगाधरजींच्या कविता मरगळलेल्या शेतकऱ्याला स्फ़ूर्ती देणाऱ्या आहेत. या कविता केवळ आरामखुर्चीतलं वाचन नाहीत. भविष्यकाळाला घडवण्याची ताकद असलेल्या जनसंमर्दाला झोपेतून जागं करणाऱ्या आहेत. आपल्याला त्या नक्की आवडतील.

# हाण त्याच्या टाळक्यात.......

ऊठ मर्दा ऊठ
आवळून घे मूठ
हाण त्याच्या टाळक्यात
पायामधला बूट

सत्तेपुढे शहाणपण
जेव्हा व्यर्थ जाते
माणुसकीचे लचके तोडून
लाचखोर खाते
पौरुषाच्या नशेचे, तेव्हा लाव दोन घूट
अन्
हाण त्याच्या टाळक्यात, पायामधला बूट

अन्यायाची सीमा जेव्हा
मर्यादेला लांघते
तुझे हक्क तुडवून
तिरडीवर बांधते
शेपटी तेव्हा खाली नको, वाघासारखा ऊठ
अन्
हाण त्याच्या टाळक्यात, पायामधला बूट

पोशिंद्याच्या छाताडावर
हरामींच्या मौजा
तेव्हा राज्य करतात
लुटारूंच्या फौजा
सत्ता आणि दलालांची, कर ताटातूट
अन्
हाण त्याच्या टाळक्यात, पायामधला बूट



माय तुझी बैलावाणी
राबराबून मेली
गल्लीमध्ये मुळं अन्
दिल्लीमध्ये वेली
अभयाने शोध घे, कोणी केली लूट
अन्
हाण त्याच्या टाळक्यात, पायामधला बूट

साहित्य प्रतिष्ठान

# राख होऊन मेला

हप्ता थकला म्हूनशान, वसुलीले गेला
हप्ता गेला भाडमंधी, राख होऊन मेला ....॥१॥

पंचीस पेट्या महिनेवारी, सेटींग जमून व्हते
तारखेवार भेटेस्तोवर, काईबी प्राब्लेम नोते
कायच्यातबी काईबी मिसळा, देल्ली व्हती हमी
साधेसिधे समिकरन; अर्धे तुमी, अर्धे आमी
हप्त्यापायी जीव जाईन, माहित नोयतं त्येला ....॥२॥

महिना उलटून गेला बैन, हप्ता नाई आला
मंग जीव सायबाचा, कालवाकालव झाला
सायेब म्हने श्याम्या तुह्या, मनात बद्दी आली?
हप्ता नाय तं धंदा नाय, कायढीन तुह्या साली
हप्त्यासाठी सांग तुनं, उशीर काहून केला? ....॥३॥

श्याम्या म्हणे उशिर कारन, मेली माही बायकू
सायेब म्हने, तुह्या बाह्यना, मी कायले आयकू?
माय मरन, पोट्टं मरन, उद्या मरन तुहा भाऊ
आमी किती दिवस मंग असे, हप्त्याबिना राहू?
एकटा मीच खात नाय, वर्तून आडर आला ....॥४॥

"पोट्टं मरन" म्हनल्यावर, झकापकी झाली
तळपायाची आग मंग, मस्तकात गेली
गुंडा नोयता तरीबी पन, गुंड्यावानी वागला
अध्धर उचलून सायबाले, भट्टीमंधी फ़ेकला
कोनी अभय ह्यो देस, भलतीकडं नेला?
हप्ता गेला भाडमंधी, भट्टीमंधी मेला ....॥५॥

भाड = भट्टी, लोहाराचा भाता
पेट्या = दोन नंबरच्या आर्थिक व्यवहारात पेटी म्हणजे लक्ष व खोका म्हणजे कोटी
बाह्यना = बहाणा, खोटी सबब
अध्धर = हवेत अधांतरी

# धोतर फ़ाटेपावृतर

मारखुंड्याच्या घरामंधी पारखुंडा गेला
धोतर फ़ाटेपावृतर सोटे खाऊन आला ...॥१॥

गाढवाम्होरं भगवद्गीता वाचून काय होते?
माणसाची अक्कल तरी भायच उतू जाते
राखडीमंदी लोळू नको, सांगासाठी गेला
उसण उतरेपावृतर लाथा खाऊन आला ...॥२॥

मुद्दे आटून गेले की, हातघाईवर येणार
शिवीगाळ करता करता, गुद्दे हाणून देणार
माणुसकीच्या गोष्टी त्याले समजवाले गेला
येता येता ढोरावाणी, रट्टे खाऊन आला ...॥३॥

पोशाखाच्या आधाराने, पारख होत नसते
कपड्याच्या आतमंदी, नंगे लपून बसते
मांडी उघडी दिसली म्हणून, झाकासाठी गेला
होती नव्हती थेय आपली, अब्रू देऊन आला ...॥४॥

अरधकच्चं ग्यान लई, खतरा असते भाऊ
नको अभय कोणाच्याबी, झाशामंदी जाऊ
कावरल्या कुत्र्यासाठी भाकर घेऊन गेला
येता येता बोम्लीवर, सुया घेऊन आला ...॥५॥

मारखुंडा = मारकुडा, पारखुंडा = पारखी, पारख करणारा

# बायको

थोडीशी पगली, थोडीशी सायको
देवानं देल्ली बावा, अशी कशी बायको ....॥१॥

सलवार घाल म्हनलं तं नववारी घालते
कपाळाच्या मंधामंधी गोल कुंकू लावते
टिकल्या-मिकल्या लावाच्या फ़ंदात पडत नाही
गळ्यामंधी गुंजीभर सोनं मिरवत नाही
थोडीशी येडपट, थोडीशी सायको
देवानं देल्ली बावा, अशी कशी बायको ....॥२॥

सिनेमा पाहू म्हनलं तं भागवतात जाते
माह्यासाठी मुठभर शिरनी घेऊन येते
मास-मच्छी-अंडीले हात लावत नाही
तरी बाप्पा तीले काही देव पावत नाही
थोडीशी भोळसट, थोडीशी सायको
देवानं देल्ली बावा, अशी कशी बायको ....॥३॥

सार्‍यायले खाऊ घालून, उरलंसुरलं खाते
कवाकवा पानी पेऊन तशीच झोपी जाते
सडासारवन, धूनंपानी, अभय सारं करते
पहाटपासून रातपावतर मरमर मरते
थोडीशी कष्टीक, थोडीशी सायको
देवानं देल्ली बावा, अशी कशी बायको ....॥४॥

शीरनी = प्रसाद, सायको = Psycho

# किती चाटणार भारतपुत्रा?

कृष्णावाणी राहुल आणि, म्हणे सोनिया भारतमाय
किती चाटणे आणखी रे, भारतपुत्रा असेच पाय? ...!!

जन्म गेला पूर्वजांचा, करता करता खुशामतगिरी
गुलाम तेही मिरवत होते, चप्पल घेऊन डोक्यावरी
दास्यत्वाची जनुकं अजुनी, काही केल्या मरत नाही
आनुवंशिकतेची देण अशी की, लाळघोटणे सरत नाही
चापलुशीम्होरं आता, कसले संस्कार, कसलं काय ...!!

राजेशाहीची भलावण, रक्तामासात भिनलेली
भाटगिरीच करता करता, बुद्धी सारी झिंगलेली
कणा आणि मणकाही, उत्क्रांतीमध्ये गळून गेला
स्वाभिमान नावाचा इसम, शरमेसंगे पळून गेला
लोकशाहीचे गुणधर्म रक्तात काही मिसळत नाय ...!!

शंभर कोटी जनतेमध्ये, राष्ट्रनायक दिसत नाही
‘ते’ घराणे सोडून अन्य, कुणीच लायक भासत नाही
असेच आमचे गणराज्य, अशीच आमची लोकशाही
भगत-बापूंना माहीत नव्हते, अर्थ निघणार असाही
मुजोर सारे अभय झाले, खाण्याकरिता मलईसाय ...!!

इसम = व्यक्ती

# नाकानं कांदे सोलतोस किती?

तुझा अभ्यास किती, तू बोलतोस किती
नाकानं कांदे सोलतोस किती?

तुझी नशा किती, तू डोलतोस किती
नाकानं डांगरं तोलतोस किती?

तुझा व्यायाम किती, तू पेलतोस किती
नाकावर भेद्रं झेलतोस किती?

तुझी मेहनत किती, तू राखतोस किती
नाकानं टेंभरं चाखतोस किती?

तुझे योगदान किती, तू लाटतोस किती
नाकानं गाजरं वाटतोस किती?

तुझी सत्ता किती, तू येलतोस किती
नाकानं आलू छिलतोस किती?

तुझी भूक किती, तू गिळतोस किती
अभयानं जनता पिळतोस किती?

डांगरं = खरबुज.
भेद्रं = टमाटर,टोमॅटो.
टेंभरं = टेंभुर्णीचे फ़ळ.
राखणे = रखवाली करणे या अर्थाने.
येलणे = वेल्हाळणे.

# बिपाशाले लुगडं

श्याम्यानं इचीबैन, कहरच केला
बिपाशासाठी मुंबईले, लुगडं घेऊन गेला ....||१||

त्याले वाटलं मायबाप, भलते गरीब असन
म्हून तिले आंगभर, कपडे भेटत नसन
वाढलीहूढली पोरगी, तरणीबांड दिसते
इकडं झाकाले गेली, तं तिकडं उघडं पडते
म्हून त्यानं कपड्याचा, थैला भरून नेला ....||२||

जुहूच्या चौपाटीवर, भेट त्यायची झाली
तिले पाहून शाम्याची, बंदी विकेट गेली
तिले म्हणे चोळी घाल, घे लुगडं नेसून
थ्ये म्हणे आवमाय, हे भूत आलं कुठून?
मंग जुहूवर धमासान, तमाशा सुरू झाला ....||३||

लय वळवलं तिचं मन, पण मन नाय वळे
मंग श्याम्या धावे मांगं, आनं थ्ये पुढं पळे
वन्समोअर,वन्समोअर, लोकं भाय बोंबले
कॅमेरेवाले पोझ घेऊन, कॅमेरे रोखून थांबले
पोलीसायनं बैनमाय, नावकूल विचका केला
आनं त्याच्या पुढचा एपीसोड, राहूनच गेला ....||४||

इचीबैन, बैनमाय = च्यायला सारखे.
वाढलीहूढली = वयात आलेली. बंदी = पूर्ण,संपूर्ण.
आवमाय = अगबाई, मांगं = मागे नावकूल = पुर्णपणे.

# कुठे बुडाला चरखा?

राजकऱ्यांनो जनतेसाठी एवढे ध्यानी घ्यावे
तुमच्यामध्ये काय ’वेगळे’ याचे उत्तर द्यावे...!!

अकबर होता, जुलूम होता, अन सुलतानी सत्ता
खुशालचेंडू मजेत होते, घामाची हालत खस्ता
काय निराळे आज भासते, तितुकेची सांगावे
तुमच्यामध्ये काय ’वेगळे’ याचे उत्तर द्यावे...!!

इंग्रज होते, लुटत होते, येथील कच्च्या माला
पक्का करूनी, चौपट दामा, विकत ग्राहकाला
काय निराळे आज आढळे, तितुकेची बोलावे
तुमच्यामध्ये काय ’वेगळे’ याचे उत्तर द्यावे...!!

रेल्वे आली, विमान आले, आले शाळा-रस्ते
कोर्ट-कचेऱ्या अन नोकऱ्या, त्याही गोऱ्या हस्ते
काय निराळे तुम्ही घडवले, तितुकेची हाकावे
तुमच्यामध्ये काय ’वेगळे’ याचे उत्तर द्यावे ..!!

टीव्ही आली, संगणक आले, आली कॉटन-बीटी
इलेक्ट्रॉनने झेप घेतली, तुमचे योगदान किती?
काय निराळे तुम्ही मढवले, तितुकेची सांगावे
तुमच्यामध्ये काय ’वेगळे’ याचे उत्तर द्यावे...!!

काय झाले ग्रामोदयाचे? कुठे बुडाला चरखा?
स्वदेशी ते काय उरले, बघा काढुनी बुरखा
दिवे तुम्ही किती लावले, अभयाने दावावे
तुमच्यामध्ये काय ’वेगळे’ याचे उत्तर द्यावे...!!

साहित्य प्रतिष्ठान

# छातीचं झाकण बोम्लीवर आलं

छातीचं झाकण आता बोम्लीवर आलं
हात्तिच्या बैनमाय भलतंच झालं ...... !!

चॅनल पाहावं कोणतंय तं उघडेबंब नाचते
टीव्ही पाह्यतांना पोरासंग, मायबाप लाजते
सभ्यतेची अभिरुची लईच दिसते न्यारी
अब्रू गेली ढोड्यात अन नोट झाली प्यारी
आता उघडं काय, झाकलं काय, सारखंच झालं
हात्तिच्या बैनमाय भलतंच झालं ...... !!

जलश्यातल्या पोरी कशा टगरबगर पाहे
चार लोकामंधी मात्र झाकूनझुकून राहे
जे काही करे ते अंधारात करे
उजेडात मात्र इज्जतीले मरे
आता उजेड काय, अंधार काय, सारखंच झालं
हात्तिच्या बैनमाय भलतंच झालं ...... !!

कालेजचे तोतामैना वर्गात नाय दिसत
आडमार्गी झाडाखाली बसते दात किसत
जनाची लाज ना मनाले खंत
खुलेआम प्रेमलीला, नाही त्याले अंत
आता दिवस काय, रात्र काय, सारखंच झालं
हात्तिच्या बैनमाय भलतंच झालं ...... !!

शायण्याने बगीच्यात जाऊ नये म्हणतात
बिनावाऱ्यानं झुडपं तिथं, खल-खल हालतात
झुडपाच्या आडोशाला दोन पाखरं बसते
"प्रेम" या शब्दाचे धिंडवडे नुसते
आता भय काय, अभय काय, सारखंच झालं
हात्तिच्या बैनमाय भलतंच झालं ...... !!

साहित्य प्रतिष्ठान

# धकव रं श्यामराव

धकव रं श्यामराव झोल नको खाऊ
नशिबाची गाथा नको कोणापाशी गाऊ ...!

रगताचं पाणी करून रान शिंपलं बावा
गारपिटानं कहर केला निसर्गानं कावा
कंबरछाती गहू होता पुरा झोपून गेला
उंबईचा फुलोरा खड्डून झाडून नेला
दोघाचंबी गऱ्हाणं सारखंच हाय भाऊ ...!

मार्केटात गेलो तर उलटे झाले गिऱ्हे
खरीददार म्हणे ह्या गहू होय का जिरे?
आजकाल म्हणे याले कोंबडी खात नाही
घेऊन जा वापस नायतर धडगत नाही
नशीब धुवासाठी मी कोणत्या गंगेत न्हाऊ?.....!

पदवीची पुंगी घेऊन पोरगं वणवण फ़िरते
डोनेशनबिगर कुठं नोकरीपाणी मिळते?
चपराश्याचा भाव सध्या सात लाख सांगते
मास्तरसाठी अभयानं बारा लाख मांगते
"नोकरीले मार गोली" म्हणलं खेतीवाडीच पाहू....!

झोल खाणे = कच खाणे.माघार घेणे.
उंबई = ओंबी, गिऱ्हे = ग्रह

साहित्य प्रतिष्ठान

# आंब्याच्या झाडाले वांगे

माणसावाणी नीती सोडून वृक्ष वागत नाही
म्हणून आंब्याच्या झाडाले वांगे लागत नाही ....!

अवर्षण येवो किंवा सोसाट्याचे वादळ
बहर आणि मोहर कधी त्याचे थांबत नाही ....!

पाने देतो, फ़ळे देतो आणि देतो छाया
बदल्यामधी घूटभर पाणी मागत नाही ....!

कोकीळ येवो, माकड येवो किंवा येवो घुबड
फ़ांदीवरती बसू देतो, भेद मानत नाही ....!

मकानाले लाकूड देतो, सयपाकाले सरपण
कुर्‍हाडीले दांडा देतो, वैरी जाणत नाही ....!

सद्‌गुणाचे सामर्थ्य अभय त्याले कळे
जरी ग्रंथ, पुराणे वा पुस्तक वाचत नाही ....!

साहित्य प्रतिष्ठान

# विदर्भाचा उन्हाळा

औंदाच्या उन्हाळ्यानं, धमालच केली
आनं श्याम्याची दाढीमिशी, भाजूनच गेली ..॥१॥

हे ऊन व्हंय का कां व्हंय, काही समजत नाही
पाण्यासाठी जीव कसा, करते लाही-लाही
पन्नास डिग्रीच्याह्यवर, पारा चढून गेला
पाणी पेऊ-पेऊ जीव, आदमुसा झाला
इच्चीबैन ओठ-जीभ, सोकूनच गेली ......॥२॥

बाहेर निघतो म्हणलं तं, जम्मून झावा चालते
घरामंधी घुसावं तं, उकाडा फ़ोडणी घालते
लोडशेडिंग पायी बाप्पा, नाकात नव आले
कूलर-पंखे गर्मी पाहून, कामचुकार झाले
उष्माघात आकडेवारी, वाढूनच गेली ......॥३॥

नदी-नाले कोरडे कारण, बरसात नाही झोंबली
पाणी कमी हाय म्हून, वीजनिर्मिती थांबली
नळामधून पाणी कमी, हवा शिट्ट्या मारते
विहीर-तलाव ठणठण, पाणी आंग चोरते
दुष्काळाची बहीणमाय, माजूनच गेली ......॥४॥

पशू-पक्षी अभय नाही, निवारा ना थारा
मागून-पुढून मस्त देते, चटके गरम वारा
दैवाचे फ़टके सोसून, माऊल्या झाल्या धीट
घागरभर पाण्यासाठी, अर्धा कोस पायपीट
नशिबाले जगरूढी, चिपकूनच गेली ......॥५॥

जम्मून = जोराने,झपाट्याने.
झावा = गरम हवेचे तडाखे.

## चापलूस चमचा

हलक्या-पतल्याचा जमाना, राह्यलाच नाही
श्याम्यासारखा इब्लिस, म्या पाह्यलाच नाही ...!!

पोम्याले म्हणे तुनं, शरम काहून विकली
मिशी पकून गेली तरी, अक्कल नाही पिकली
मुकरदमच्या चपला चक्क, डोस्क्यावर घेते
एवढा कसा लाचार होऊन, त्यायचे धोतरं धुते
असा चापलूस चमचा म्हणे, झालाच नाही ...!!

चारचौघात गेला तं, अक्कल तारे तोडते
शोकसभेत बोलंण तं, जम्मून भाषण झोडते
असे गुण गावते, जे मयतात असन-नसन
याचं भाषण आयकून, थो मुर्दा हासत असण
देवळामंधी हार कधी, वाह्यलाच नाही ...!!

थेटरमंधी जाईन तं, सुद्रा नाय बसणार
अभयतेनं खुर्ची भेदून, याची तंगडी घुसणार
तमाशातल्या बाईवर, नोटा-बंडल लुटते
दमडीसाठी भिकाऱ्याले, अक्कल सांगत सुटते
जिंदगीचा डाव मात्र, हारलाच नाही ...!!

# लकस-फ़कस

काहून बाप्पा रंगराव, लकस-फ़कस चालता
खादीचं धोतर सोडून, मांजरपाठ घालता....!!

’सहकारात’ होते तेव्हा, काय तोरा व्हता
कौलारू खोपडं पाडून, इमले बांधत व्हता
कशी कमाई होते बाप्पा, भगवंताची माया
देवधरम सोडून जनता, पडे तुमच्या पाया
पद गेल्याच्यानं आता, गोमाश्या हाकलता....!!

म्हणा काही रंगराव, गणित तुमचं चुकलं
विरोधात बसले म्हून, खिसे भरणं हुकलं
बाकीच्यायनं थातुरमातुर, टोपीपालट केली
दोन पिढ्या बघा कशी, गरिबी हटून गेली
पब्लिकच्या भावनेसंगं, चेंडूवाणी खेलता ....!!

होयनोय उठसूठ, विमानवाऱ्या करता
खुर्चीच्या लोभापायी, दिल्लीत पाणी भरता
जनतेचे प्रश्न जरा, अभयतेनं मांडा
मणका टाईट ठेवूनशान, खमठोकपणे भांडा
हायकमांडच्या गुरकावणीले थरथर हालता ...!!

लकस-फ़कस = बेडौल
मांजरपाठ = स्वस्त व जाड धोतर

# झ्यामल-झ्यामल

कायरं श्याम्या इथंतिथं झ्यामल-झ्यामल करतोस
बैन तोंडाले खरूज आनं मोंढ्याले खाजवतोस....!!

ईचीबैन हे गजकरण भलतच भारी असते
चहाड्या-चुगल्या केल्याबिना पोट भरत नसते
अफवा पेरासाठी लोकायचे कानफट पाजवतोस
बैन तोंडाले खरूज आनं मोंढ्याले खाजवतोस....!!

याची टोपी त्याच डोस्कं, काट्याने काटा काढतोस
साथ देईन त्यालेच तू, तोंडबुचक्या पाडतोस
सिध्यासाध्या असामीले, बोटावर नाचवतोस
बैन तोंडाले खरूज आनं मोंढ्याले खाजवतोस....!!

समोरच्या तंगडीमध्ये, आडवी तंगडी घालतोस
त्याले उबडं पाडूनशान, त्याच्या म्होरं चालतोस
समद्यायले झाशा देऊन, अभये भाकरी भाजतोस
बैन तोंडाले खरूज आनं मोंढ्याले खाजवतोस....!!

मोंढा = पाठीचा खांद्यालगतचा भाग.

# खाया उठली महागाई

नाकी तोंडी पाणी घुसले, जीव झकोले खाई
वेसण तुटली, स्वैर सुटली, खाया उठली महागाई...!!

आवतन नव्हते दिले तरी, वाजत-गाजत आली
एक तारखेस खिसा भरला, पाच तारखेस खाली
देवदर्शन दुर्लभ झाले, आता पायी पंढरीवारी
गहाळ झाल्या सोयी-सुविधा, परी कर वाढतो भारी
धान्यामधी खडे मिसळती, शासक टुकटुक पाही
वेसण तुटली, स्वैर सुटली, खाया उठली महागाई...!!

तेलामध्ये भेसळ होते, मिरची मध्ये गेरू
पाचक रसा दुर्बल करते, व्याधी पाहते घेरू
दवादारू महाग झाली,आतून काळीज पिरडी
गरिबाघरी कँसर आला, बांधून ठेवा तिरडी
मुक्ती मागे रोगी सत्वर,अन यमास नसते घाई
वेसण तुटली, स्वैर सुटली, खाया उठली महागाई...!!

नाही आवर महागाईला, मग कशास शासनकर्ते?
इच्छाशक्ती मरून जाता, औचित्य काय ते उरते?
लाल दिव्याचा हव्यास केवळ, केवळ सत्तापिपासा
घाऊकतेने भरडून खाती, हीन-दीनांच्या आशा
आमजनांना अभयदाता, 'विचार' उरला नाही
वेसण तुटली, स्वैर सुटली, खाया उठली महागाई...!!

झकोले = हेलकावे, आवतन = आमंत्रण,
पिरडी = पिरडणे = पिरगाळणे

# पलंग मोडून व्हता

कोण जाणे कोणासंग टाका भिडून व्हता...।
सपनातून जाग आली तं पलंग मोडून व्हता... ॥

जवा पाय कसाबचे मुंबईमंधी पडले
“लालबत्ती” वाले तमाम घरामंधी दडले
तवा म्हणान माहा पारा असा काही चढला
दोन ढूशे मारून त्याले तोंडबुचक्या पाडला
पायापोटी तवा कसाब माह्या पडत व्हता... ॥
अन्
सपनातून जाग आली तं पलंग मोडून व्हता... ॥

सुराज्याचं सपन जवा शिवाजीले पडलं
इचिबैन तवा मले जाम स्फूरण चढलं
मंग म्हणान माही तलवार अशी काही चालली
एका हिसक्यात सारी सेना धारातिर्थी पाडली
चूलीमागं औरंगजेब जीव लपवत व्हता... ॥
अन्
सपनातून जाग आली तं पलंग मोडून व्हता... ॥

रावणानं सीता चोरून लंकेमंधी नेली
तळपायीची आग माह्या मस्तकात गेली
तोडून त्याचे नऊ मुंडके, मी संग घेऊन आलो
पण; तवापासून मीच “अभय” दहातोंड्या झालो
काय करू, काय नाही; मले समजत नाही आता
अन्
सपनातून जाग आली तं घाम फुटून व्हता... ॥

# कवी : श्री गंगाधर मुटे



मित्रहो,
मी हाडाचा ना कवी ना लेखक.
मी आहे एक हाडा-मांसा-रक्ताचा शेतकरी.
शेतकरी कुटूंबात जगतांना जे पाहीलं,अनुभवलं,
ते बरं-वाईट वास्तव प्रामाणिकपणे लिहायचा प्रयत्न करतोय.
त्यासोबत काही न उलगडलेली उत्तरे शोधायचा प्रयत्नही करतोय.
...............

मित्रहो,

तीन हजारच्या आसपास लोकसंख्या असलेलं माझं एक छोटसं गाव. जन्म आणि बालपण येथेच गेलेलं. महाविद्यालयीन शिक्षण व त्यानंतर मार्केटींग क्षेत्रात नोकरी करतांना थोडाफ़ार काळ शहरात गेलेला. पण काही अपरिहार्यतेमुळे पुन्हा एकदा गावाकडे पावले वळली आणि येथे स्थायिक झालो तो कायमचाच.

कविता,गाणी व भजने लिहिण्याची बालपणी खूप आवड होती. मजा वाटायची, आनंद लुटायचो पण बालपण संपायच्या आतच 'भाकरीचे प्रश्न' निर्माण झालेत आणि 'भाकरीचा शोध' घेता-घेता उरलेलं बालपण,तरूणपण यांची पुरती वाट लागली, अगदी जळून राख झाली. आणि त्यासोबतच कविता,गाणी व भजने लिहिण्याची ऊर्मी,प्रेरणा कुठे व कशी गहाळ झाली ते कसे म्हणुन कळालेच नाही.

“शोधात भाकरीच्या निम्मी हयात गेली
स्वप्नेच वांझ झाली, तारूण्य जाळतांना.”

अशी 'आयुष्य कोमात' गेलेली अवस्था दोन-चार वर्षे नव्हे तर चक्क दोन तपाला पुरून उरेल एवढा काळ कायम होती.

काळाच्या प्रवाहात भाकरीचा प्रश्न सुटला. आयुष्यात जे जे हवे ते ते मिळाले. पण कविता करण्याची प्रेरणा मात्र करपूनच गेली होती. मी कवितेला अन् कवितेने मला पुर्णत: एकमेकांना विसरलोच होतो. पाऊलखुणा सुद्धा उरल्या नव्हत्या. याजन्मी भेटगाठ होईल असेही वाटलेच नव्हते कधी.

एका अर्थाने आयुष्य संपलेच होते.

पण .....

काही दिवसापुर्वी अपघाताने मराठी संकेतस्थळ “मायबोली” वर गेलो. तेथे रमलो आणि चमत्कारच झाला.

पुन्हा एकदा आयुष्याला नवा टर्निंग पॉईंट मिळाल्याचा भास होतोय.

पुन्हा एकदा नव्या जोमाने “ते” बालपण परत आल्यासारखे वाटतेय.

जीवनाचे सर्व रंग माझ्या भोवताली फ़ेर धरून नाचताहेत असा आभास होतोय.

आणि जी कविता खूप दूर निघून गेली होती ती आता खुणावत असल्याची स्वप्नेही पडायला लागलीय.

पण हे मी तुम्हाला का म्हणून सांगतोय? कशासाठी सांगतोय? आत्मस्तुती की आत्मगौरव? मनशांतीसाठी की मनमोकळे करण्यासाठी? निष्कारण बडेजाव की शब्दपाल्हाळ?

.

प्रश्न अनेक पण उत्तर मात्र एकच.....

.

ही कहानी माझी एकट्याची नाही. या देशात सत्तर टक्के जनता ज्या तऱ्हेने जीवन जगत्येय ते पाहता ही बहूसंख्य घरातील कहानी आहे.

चार भिंतीच्या आत अशा कहाण्यांचा जन्म होतो आणि चार भिंतीच्या आतच कहानीचा शेवट.

अशा कहाण्यांना वाच्या फ़ुटावी. काही ठोस उपाययोजना व्हाव्यात अशा काहीशा भाबड्या आशेने या चार भिंतिच्या आतील दु;खाचे उदात्तीकरण करण्याचा एक इवलासा प्रयत्न.

.

मित्रहो,

आपणास माझे काव्य आवडले तरी आणि नाही आवडले तरीही प्रतिक्रिया अवश्य द्या...

संपर्क : गंगाधर मुटे

मु.पो - आर्वी छोटी – ४४२३०७

त. हिंगणघाट जि.वर्धा.

ईमेल : ranmewa@gmail.com

ई साहित्य प्रतिष्ठान

“हल्ली कोणी वाचत नाही, वाचत नाही” असं सगळेच म्हणतात. मराठीला उतरती कळा लागली म्हणून गळे काढतात. अशा वेळी लाखो लोकांसाठी विनामूल्य ई पुस्तकं बनवतंय ई साहित्य प्रतिष्ठान. आम्ही सर्वसामान्य वाचकांना आवडतील अशी एकाहून एक भारी पुस्तकं दर आठवड्याला सादर करतो. या कार्यात प्रत्येकाचा हातभार हवा आहे. मराठीत हा वाचनाचा यज्ञ सदा प्रज्वलित रहावा म्हणून. तुमच्या ओळखीच्या सर्व मराठी माणसांचे ई पत्ते मिळवा आणि आम्हाला पाठवा. त्यांना आम्ही पुस्तके पाठवू. त्यांना नाही आवडली तर त्यांनी सांगताच बंद करू. आणि पुस्तके सोडून इतर काहीही फ़ालतू जाहिराती वगैरे पाठवणार नाही याची हमी आम्ही घेतो. तर मग वाट का बघता? जगभरात पसरलेल्या लाखो मराठी दोस्तांना ही भेट द्या.

आपल्या ओळखीच्या दोन, चार, दहा जितक्या जमतील तितक्या लोकांचे मेल आयडी esahity@gmail.com या पत्त्यावर पाठवा.

ई साहित्य प्रतिष्ठान

